**<u>अग्निशमन आपत्कालिन सेवांचे बळकटीकरण करण्यासाठी महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान योजनेंतर्गत नागभीड (जि.चंद्रपूर) नगरपरिषद यांना निधी मंजूर करण्याबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-अशसे-२०१८/प्र.क्र.६३/नवि-०४**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :-१७ आक्टोबर, २०१८**

**वाचा:-** १) शासन निर्णय नगर विकास विभाग क्र.अशस-४०७/३६०/प्र.क्र.२११/नवि-२०, दि.३१.०८.२००९.

२) शासन निर्णय नगर विकास विभाग क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२७/नवि-२०, दि.१२.८.२०१६.

३) महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.मअसे/३२-क/२०१८/१५८, दि.३१.०१.२०१८.

**<u>प्रस्तावना :-</u>**

राज्यातील ड-वर्ग महानगरपालिका/नगरपरिषदा तसेच नगरपंचायती यांच्या अग्निशमन सेवेतील तूट भरून काढण्याकरिता व राज्यातील अग्निशमन सेवेचे सक्षमीकरण करण्याकरिता विविध आवश्यक उपाययोजना करण्याच्या दृष्टीने दि.३१.०८.२००९ रोजी महाराष्ट्र अग्निसुरक्षा अग्निसुरक्षा अभियान राबविण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. सदर शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या सूत्राप्रमाणे ("ड"वर्ग महानगरपालिकांसाठी ३५ % शासन हिस्सा, "अ" वर्ग नगरपरिषदांसाठी ५०% शासन हिस्सा, "ब" वर्ग नगरपरिषदांसाठी ७०% शासन हिस्सा, तसेच "क" वर्ग नगरपरिषदांसाठी ८०% शासन हिस्सा ) अनुदान देण्यासाठी संबंधित नगरपरिषदांकडून प्राप्त सविस्तर प्रकल्प अहवालांच्या छाननीअंती अनुदान वितरित करण्यात येते. आता उपरोक्त संदर्भ क्र. (३) अन्वये अग्निशमन सेवा संचालनालय, महाराष्ट्र शासन यांनी शिफारस केल्यानुसार शासन निर्णय,नगर विकास विभाग दि.१२.८.२०१६ नुसार नव्याने स्थापन झालेल्या नागभीड नगरपरिषद,जि.चंद्रपुर यांचा महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियानांतर्गत (प्राथम्य क्र.१) समावेश करून त्यांच्या शासन हिश्श्याची रक्कम वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा यांनी वाचा क्र.३ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरून महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियानांतर्गत नागभीड नगरपरिषद,जि.चंद्रपुर यांचा महाराष्ट्र अग्निसुरक्षांतर्गत (प्राथम्य -१) समावेश करून, त्यांना १ अग्निशमन केंद्र बांधण्यास व १ अग्निशमन वाहन खरेदी करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियांनातर्गत मुख्याधिकारी, नागभीड नगरपरिषद,जि.चंद्रपुर यांनी अग्निशमन केंद्राचे बांधकामाचे रू. ५०,०१,८०७/- (रूपये पन्नास लाख एक हजार आठशे सात फक्त) इतक्या रक्कमेचे अंदाजपत्रक कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग,नागभीड यांच्याकडून तांत्रिक मान्यता घेऊन सादर केले आहे.

३. अग्निशमन वाहनाकरीता व अग्निशमन केंद्राच्या इमारतीचे बांधकामाकरीता **रू.६४,००,०००/- (रूपये चौसष्ट लाख मात्र)** इतक्या रक्कमेस खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

अ) सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने कार्यवाही करत असताना शासन निर्णय ,सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.बीडीजी २०१४/प्र.क्र.९६/इमा.३, दि.८.७.२०१४ मधील कार्यपध्दतीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

ब) काम सुरू करण्यापूर्वी अंदाजपत्रक सार्वजनिक बांधकाम विभाग व प्रशासकीय विभागाने सक्षम अधिकारी यांच्याकडून साक्षांकित करून घ्यावे.

क) काम सूरू करण्यापूर्वी मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तूविशारदांकडून मंजूरी घेऊनच काम सूरू करावे.

ड) ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक/दरपत्रके मंजूर करूनच काम हाती घ्यावे.

इ) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानूसार कार्यवाही करण्यात यावी.

४. महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियानातील प्राथम्य-१ मध्ये समाविष्ट करण्यात आलेल्या नागभीड नगरपरिषद,जि.चंद्रपुर करीता १ अग्निशमन केंद्र व १ अग्निशमन वाहन याकरिता एकूण रू.८०.०० लक्ष इतका खर्च अनुज्ञेय आहे. त्यापैकी शासन अनुदानाची रक्कम रू.६४/- लक्ष (अक्षरी रुपये चौसष्ट लक्ष केवळ) इतकी रक्कम १ अग्निशमन केंद्र व १ अग्निशमन वाहन याकरिता तसेच सदर निधीचा विनियोग पूर्णत: झाल्याबाबतची उपयोतगिता प्रमाणपत्रे सादर करण्याच्या अटीच्या अधिन राहून सन २०१८-१९ या आर्थिक वर्षामध्ये मंजूर करण्यात येत आहे.

५. या खर्चाचे देयक काढण्यासाठी संचालक, महाराष्ट्र अग्निमशन सेवा संचालनालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी व आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात आले असून, त्यांनी सदर रक्कमेचा धनादेश मुख्याधिकारी, नागभीड नगरपरिषद,जि.चंद्रपुर यांच्या नावे काढावा.

६ सदर कामासाठी येणारा खर्च “एफ-२, २२१७, नगर विकास, १९२, नगरपरिषदांना सहाय्य, (००)(५३) राज्यातील नगरपरिषदांना अग्निशमन सेवा व आणीबाणीच्या सेवांच्या बळकटीकरणासाठी सहाय (२२१७ ३२१५) ३१, सहाय्यक अनुदान (वेनतेतर)” या लेखाशिर्षाखाली उपलब्ध करून देण्यात आलेल्या सन २०१८-१९ च्या मंजूर अनुदानमधून भागविण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय वित्त विभाग,शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ वित्तीय अधिकार विनियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग-पाच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अन्वये प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तींचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.२ एप्रिल, २०१८ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तीच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे. सदर परिपत्रकातील परिच्छेद ७ मधील तसेच परिशिष्टातील अ.क्र.८मधील तपासणीसुचीतील अ.क्र.१ ते १० मधील लागू असलेल्या अटी व शर्तीची पुर्तता होत असल्याचे प्रमाणीत करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१८१०१७१३४५३८०१२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sharad Kirwale
Digitally signed by Sharad Kirwale
DN: CN = Sharad Kirwale, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Urban Development Department
Date: 2018.10.19 15:06:44 +05'30'

**( शरद किरवले )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

२) मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४) प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
५) प्रधान सचिव-१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव-२, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर
८) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र , मुंबई/ नागपूर
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
११) संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई
१२) अग्निशमन सल्लागार, महाराष्ट्र शासन, सांताक्रुझ (पुर्व), मुंबई
१३) संचालक, अग्निशमन सेवा संचालनालय, सांताक्रुझ (पुर्व), मुंबई.

यांना विनंती करण्यात येते की, सदर निधी मुख्याधिकारी,नागभीड नगरपरिषद,जि.चंद्रपूर यांना वितरित करुन अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

१४) मुख्याधिकारी, नागभीड नगरपरिषद,जि.चंद्रपूर
१५) कक्ष अधिकारी (व्यय-३) / (अथसंकल्प-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) कक्ष अधिकारी (नवि-२९)/(नवि-३१), नगर विकास, विभाग,मंत्रालय, मुंबई
१७) निवडनस्ती, (नवि-०४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.